अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ आयोजित अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या आयोजनासाठी अर्थसहाय्य मंजूर करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**मराठी भाषा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: सासंअ-१०१५/प्र.क्र.१०३/२०१५/भाषा-३,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

तारीख: ०९ ऑक्टोबर, २०१५.

**प्रस्तावना :-**

अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाकडून आयोजित करण्यात येणाऱ्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या आयोजनासाठी शासनाकडून कायमस्वरुपी दरवर्षी रु.२५.०० लक्ष (रुपये पंचवीस लक्ष फक्त) इतके अर्थसहाय्य मंजूर करण्याच्या योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

या शासन निर्णयान्वये, अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळामार्फत दरवर्षी अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या प्रस्तावित ठिकाणी निमंत्रक संस्थेच्या वतीने आयोजित करण्यात येणाऱ्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या आयोजनासाठी रुपये २५,००,०००/- (रुपये पंचवीस लक्ष फक्त) इतके अर्थसहाय्य खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून मंजूर करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(१) अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाने अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनास अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाकडे सादर करावा.

(२) महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनास अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाकडून, मंडळाकडे प्राप्त झाल्यानंतरच प्रस्तावित संमेलनासाठी रु.२५.०० लक्ष इतकी अर्थसहाय्याची रक्कम अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळास वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

(३) अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाकडून एखाद्या वर्षी अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे आयोजन न झाल्यास त्यासाठी मंजूर करण्यात आलेली तरतूद शासन मान्यतेशिवाय अन्यत्र वापरली जाणार नाही याची दक्षता महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने घ्यावी.

(४) महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनासाठी उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या अर्थसहाय्याची रक्कम दरवर्षी दसऱ्यापूर्वी अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाच्या खात्यात जमा करावी. त्यादृष्टीने प्रस्तावित संमेलनाचा तपशील अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाकडून पुरेशा आधी मागविण्याची खबरदारी महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने घ्यावी.

(५) महाराष्ट्र शासनाकडून उपलब्ध करून देण्यात येत असलेल्या अर्थसहाय्याचा विनियोग केवळ अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनामध्ये, मराठी भाषा आणि साहित्य विषयक आयोजित करण्यात येणाऱ्या विविध उपक्रमांसाठीच करण्यात यावा.

(६) अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या आयोजनाबाबत नियम, कायदे आणि आर्थिक बाबी यांची यथायोग्य पूर्तता करण्याची संपूर्ण जबाबदारी अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाची असेल. महाराष्ट्र शासन या संदर्भात जबाबदार असणार नाही.

(७) अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनासाठी शासनाकडून उपलब्ध करून देण्यात आलेल्या निधीचे विनियोजन प्रमाणपत्र, संमेलन वृत्तांत, सनदी लेखापालांकडून तपासून घेण्यात आलेले लेख्यांचे विवरणपत्र संमेलनानंतर ६ महिन्यांच्या आत अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाने शासनाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळास सादर करावे. तसेच या बाबतचा पूर्तता अहवाल उपयोगिता प्रमाणपत्रासह महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने शासनास सादर करावा.

(८) अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनासाठी शासनाकडून मंजूर करण्यात आलेल्या अर्थसहाय्याबाबतची सर्व कागदपत्रे व हिशोब महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई किंवा त्यांचे अधिकारी यांना तपासण्याचा अधिकार असून त्यांनी मागणी केल्यास सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणीसाठी सादर करावीत.

२. यासाठी सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या त्यांच्या अधिपत्याखालील दुय्यम अधिकाऱ्यास यासंबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. यासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक २२०५-कला व संस्कृती-१०२-कला व संस्कृती प्रचालन, (०१) योजनेतर योजना (०१) (१०) अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनास अनुदान (२२०५ ३४४८) - ३१- सहायक अनुदान या लेखाशिर्षाखाली मंजूर करण्यात येणाऱ्या अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्राप्रमाणे भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक-१०.०६/प्र.क्र.१/अर्थोपाय, दिनांक २०.०४.२००६ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००९१३४०२१११३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vrushali Vasant Sawant

Digitally signed by Vrushali Vasant Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3a8b10880e63a3addaee562fb4862d2a7c26e375d1855490cfd1bb528647db40, cn=Vrushali Vasant Sawant
Date: 2015.10.09 13:42:49 +05'30'

(वृषाली व. सावंत)

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत** -

१. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.मंत्री (मराठी भाषा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
५. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
६. स्वीय सहायक, प्रधान सचिव (मराठी भाषा), मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,
८. अध्यक्ष, अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ, पुणे (महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई यांचेमार्फत),
९. अवर सचिव (अर्थसंकल्प), मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. निवड नस्ती / भाषा-३.